सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर तालुक्यातील ग्रामीण रुग्णालय चालविण्याकरीता बेल-एअर रुग्णालयास अनुदान मंजुर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अनुदान-२०२१/ प्र.क्र.३२/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख : ०४ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा** :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.१२९/आरोग्य-४, दि.२७.०३.२०१८.
२) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.१२९/आरोग्य-४, दि.११.०१.२०१९.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अनुदान-२०२०/प्र.क्र.९५/आरोग्य-४, दि.१८.०४.२०२०.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.९९/आरोग्य-४, दि.१२.०६.२०२०.
५) शासन शुध्दीपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.९९/आरोग्य-४, दि.१६.०६.२०२०.
६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पीपीपी-२०२१/प्र.क्र.३१/आरोग्य-४, दि.१७.०२.२०२१.
७) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अनुदान-२०२१/प्र.क्र.३२/आरोग्य-४, दि.३१.०३.२०२१.
८) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), मुंबई यांचे पत्र, क्रमांक : ससंआसे /कक्ष-६४/सहा.अनु/ग्रारुमहाबळेश्वर/उर्वरित अनुदान/८३२८-३०/२१, दि.०२.०६.२०२१.

**प्रस्तावना** :-

सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर तालुक्यातील ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्र, तळदेव व प्राथमिक आरोग्य केंद्र, तापोळा आणि तळदेव व तापोळा येथील प्राथमिक आरोग्य केंद्राच्या अंतर्गत असलेली १४ उपकेंद्रे, उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक ४ व ५ च्या शासन निर्णय व शुध्दीपत्रकान्वये इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पांचगणी (महाबळेश्वर), जि.सातारा संचलीत बेल-एअर रुग्णालय या संस्थेस दि.३१.०३.२०२३ पर्यत चालविण्यास देण्यासाठी, मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर संस्थेने ग्रामीण रुग्णालय, महाबळेश्वर या रुग्णालयाचे माहे फेब्रुवारी, २०२० ते जानेवारी, २०२१ पर्यंत (१२ महिने) या कालावधीचे कामकाज केला असल्याने, या कालावधीकरीता संस्थेने केलेल्या खर्चापोटी अनुदान मंजूर करण्याबाबतचा सहसंचालक,

आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), मुंबई यांनी सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :-

ग्रामीण रुग्णालय, महाबळेश्वर जिल्हा सातारा या रुग्णालयावरील फेब्रुवारी, २०२० ते जानेवारी, २०२१ या कालावधीतील कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील व वेतनेंतर खर्चाची प्रतीपुर्ती बेल-एअर रुग्णालयास करण्यासाठी रु.१,०२,१९,८१२/- अनुदान मंजूर करणेबाबतचा सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन) आयुक्तालय, मुंबई यांचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. परंतु, सदर संस्थेस संदर्भाधिन अनुक्रमांक ७ येथील शासन निर्णयान्वये फेब्रुवारी, २०२० ते नोव्हेंबर, २०२० पर्यंत (१० महिने) साठी रु.४७,२८,०००/-इतके अनुदान सदर संस्थेस अदा करण्यात आले आहेत. तरी, सदर संस्थेस उर्वरित देय रक्कम रु.५४,९१,८१२/-(रुपये चौपन्न लाख, एक्याण्णव हजार, आठशे बारा फक्त) इतके अनुदान अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी .आर-१, “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा, ११०-रुग्णालय व दवाखाने, ११० (४), मुफसल रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३)(०१) अध्यापनेत्तर रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान (२२१० ०१७३), ३१-सहाय्यक अनुदाने” या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत तरतूद सहसंचालक, आरोग्य सेवा, राज्यस्तर (रुग्णालय), मुंबई यांनी सदर संस्थेला अदा करण्यासाठी उपसंचालक, आरोग्य सेवा पुणे मंडळ, पुणे यांना हस्तांतरीत करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९०७१४५०२६२२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2021.10.04 15:28:11 +05'30'

प्र. मो. बलकवडे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

३. संचालक, आरोग्य सेवा-२, संचालनालय, पुणे.
४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य), पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
८. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
९. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, सातारा.
१०. ग्रामीण रुग्णालय महाबळेश्वर, जिल्हा सातारा.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सातारा.
१२. इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पांचगणी (महाबळेश्वर), जि.सातारा संचलीत बेल-एअर हॉस्पिटल, महाबळेश्वर, जि. सातारा.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती (सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-४).